**निवृत्तिवेतन प्रकरणात दाखल होणाऱ्या न्यायालयीन प्रकरणांच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- संकीर्ण २०२३/ प्र.क्र.३०/ सेवा-४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ०३ एप्रिल, २०२३

**शासन परिपत्रक**

निवृत्तिवेतनधारकांकडून निवृत्तिवेतनविषयक लाभांच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालय / महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण येथे याचिका दाखल होत असतात. सदर याचिकामध्ये दिलेल्या न्याय निर्णयाची अंमलबजावणी प्रशासकीय विभागांकडून विहित वेळेत होत नसल्याने प्रस्तुत प्रकरणी अवमान याचिका दाखल करण्यात येत असून त्यामध्ये महालेखापाल कार्यालयालाही प्रतिवादी करण्यात येते. वस्तुत: महालेखापाल कार्यालयाचे काम विभागाकडून प्राप्त होणाऱ्या निवृत्तिवेतन प्रकरणाची छाननी करणे इतक्याच मर्यादेत असते. सद्य:स्थितीत अवमान याचिकांची संख्येत लक्षणीयरित्या वाढ झालेली आहे. यास्तव, याबाबत उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

१) सर्व कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, ज्या सेवानिवृत्तिविषयक लाभ देण्यासंदर्भातील न्यायालयीन प्रकरणामध्ये महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील संबंधित तरतूदींच्या विरोधात आदेश पारीत झाले आहेत, अशा प्रकरणात न्यायालयाच्या आदेशानुसार निवृत्तिवेतन प्रकरण संबंधित प्रशासकीय विभागाच्या सहमतीनेच महालेखापाल कार्यालयाकडे सादर करावे.

२) ज्या न्यायालयीन प्रकरणामध्ये महालेखापाल कार्यालयास प्रतिवादी करण्यात आले असेल अशा प्रकरणी संबंधित प्रशासकीय विभागाने शपथपत्र दाखल करताना महालेखापाल कार्यालयाचे काम विभागाकडून प्राप्त होणाऱ्या निवृत्तिवेतन प्रकरणाची छाननी करणे इतक्याच मर्यादेत असल्याची बाब नमूद करुन महालेखापाल कार्यालयाचे नाव प्रतिवादी/पक्षकार म्हणून वगळण्याची विनंती मा.न्यायालयास करावी.

३) वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक ०२/०७/२०१५ अन्वये दिनांक ०१/०९/२०१५ नंतर प्रत्येक निवृत्तिवेतन प्रकरण ऑनलाईन सादर करणे बंधनकारक करण्यात आले आहे. तथापि त्याचे पालन होत नसल्याचे निदर्शनास आणून देण्यात आले आहे. सबब, सेवार्थ वगळता अन्य वेतनप्रणालीमधून निवृत्तिवेतन प्रकरणे महालेखापाल कार्यालयास सादर करताना, ऑनलाईन सादर करणे अनिवार्य करण्यात येत आहे. त्यानुषंगाने तीन महिन्याच्या आत संबंधित प्रणालीमध्ये योग्य तो बदल करुन निवृत्तिवेतन प्रकरणे ऑनलाईन सादर करावीत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०४०३१५४४२०५३०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAMAKANT SHIVAJIRAO GHATGE

Digitally signed by RAMAKANT SHIVAJIRAO GHATGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=927f16b596a85f3f04b621916641eefd1bb6b4367c467eb0b061a30ce41ba8ec, pseudonym=AD5BA171C660951BA0BF959863A4808251FBFD58, serialNumber=175D8C74402686B296B9A00D70E6C51C0711C360974050D297FD3F96075BFCAE, cn=RAMAKANT SHIVAJIRAO GHATGE
Date: 2023.04.03 15:50:34 +05'30'

**( र. शि. घाटगे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४)मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५)मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य.
८) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई.
१०) सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
१२) मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
१३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१५) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१७) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
१८) प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
१९) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
२०) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.
२१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
२२)सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२३) मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग,मुंबई.
२४) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली.
२५) सर्व विभागीय आयुक्त.
२६) सर्व जिल्हाधिकारी.
२७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

२८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

२९) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.

३०) सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद /अमरावती / नागपूर.

३१) संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई.

३२) सह संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती नागपूर.

३३) वित्त विभागातील सर्व कार्यासने.

३४) निवड नस्ती.